“महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५” च्या अंमलबजावणीसाठी “लोकसेवा हक्क आयोग” यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडणे तसेच सध्या “राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त” यांच्या कार्यालयासाठी नियंत्रक अधिकारी /आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणे...

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आरटीएस-२०१७/प्र.क्र.४८/१८ (र.व का.)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१६ मार्च २०१७

**वाचा :**

१) महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५, दिनांक २१ ऑगस्ट २०१५.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई यांचे पत्र क्रमांक-ख.वि/चा-१/सामान्य प्रशासन विभाग/युओआर-८/२०१६-१७/२५३, दिनांक १० जून २०१६
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४५/१८ (र.व का.), दिनांक १७ जून २०१६
४) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः आरटीएस-२०१७/प्र.क्र.३५/१८ (र.व का.), दिनांक २८ फेब्रुवारी २०१७

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यात पारदर्शक, कार्यक्षम व समयोचित लोकसेवा देण्याकरिता आणि पात्र व्यक्तींना लोकसेवा देणाऱ्या शासकीय विभागामध्ये व अभिकरणांमध्ये आणि इतर सार्वजनिक प्राधिकरणांमध्ये पारदर्शकता व उत्तरदायित्व आणण्यासाठी दिनांक २१ ऑगस्ट २०१५ च्या अधिसूचनेन्वये “महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५” प्रख्यापित करण्यात आला आहे. हा कायदा दिनांक २८ एप्रिल २०१५ पासून अंमलात आला आहे.

२. या विभागाच्या दिनांक १७ जून २०१६ च्या शासन निर्णयान्वये मुंबई शहर जिल्हा व मुंबई उपनगर जिल्हा यासाठी “राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त” तसेच प्रत्येक महसुली विभागाकरिता एक “राज्य सेवा हक्क आयुक्त” व त्यांच्या कार्यालयांसाठी अधिकारी / कर्मचारीवृंद अशा एकूण १४२ पदांची निर्मिती करण्यात आली आहे.

३. “लोकसेवा हक्क आयोग” नवीन योजनांतर्गत योजनेसाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

४. महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ मधील तरतूदीनुसार “राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त” या पदावर श्री.स्वाधीन क्षत्रिय, माजी मुख्य सचिव यांची दिनांक २८ फेब्रुवारी २०१७ रोजीच्या

अधिसूचनेन्वये नियुक्ती करण्यात आली असून, दिनांक १ मार्च २०१७ रोजी त्यांनी सदर पदाचा कार्यभार स्वीकारला आहे. आयुक्त वगळता गट-अ, गट-ब (राजपत्रित / अराजपत्रित), गट-क या संवर्गातील अधिकारी / कर्मचारीवृंद प्रतिनियुक्तीने भरण्यात येणार आहेत. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय निर्मल भवन, दुसरा मजला, नरिमन पॉईंट, मुंबई येथे लवकरच सुरु होणार आहे. यामुळे सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) मध्ये सदर लेखाशीर्षाच्या नियंत्रणासाठी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u> :

**"लोकसेवा हक्क आयोग" या नवीन योजनांतर्गत योजनेसाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक-ए-४ | Demand No.A-4 |
| २०७०-इतर प्रशासनिक सेवा | 2070-Other Administrative Services |
| ८००-इतर खर्च | 800-Other Expenditure |
| (००)(१०) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग (योजनांतर्गत योजना) (२०७०ए००२) | (00)(10) Maharashtra State Right to Service Commission (Planned Scheme)( 2070A002) |
| ०१-वेतन | 01-Salaries |
| ०३-अतिकालिक भत्ता | 03-Overtime Allowance |
| ०६-दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | 06-Telephone, Electricity and Water Charges |
| ११-देशांतर्गत प्रवास खर्च | 11-Domestic Travel Expenses |
| १२-विदेश प्रवास खर्च | 12-Foreign Travel Expenses |
| १३-कार्यालयीन खर्च | 13-Office Expenses |
| १७-संगणक खर्च | 17-Computer Expenses |
| २०-इतर प्रशासकीय खर्च | 20-Other Administrative Expenses |
| २८-व्यावसायिक व विशेष सेवा | 28-Professional Service |
| ५१-मोटार वाहने | 51-Motor Vehicles |

२. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-२६/१४४३, दिनांक १६ फेब्रुवारी २०१६, वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१५२/१६/व्यय-४, दिनांक १४ मार्च २०१६ आणि अनौपचारिक संदर्भ क्रमांक-८२/अर्थ-१४, दिनांक २० एप्रिल २०१६ तसेच महालेखापाल, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-ख.वि/चा-१/सामान्य प्रशासन विभाग/ युओआर-८/२०१६-१७/ २५३, दिनांक १० जून २०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय तात्पुरत्या स्वरुपात सुरु करण्यात येत आहे. त्यांच्या कार्यालयातील अधिकारी व कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते / अतिकालिक भत्ता / दूरध्वनी, वीज व

पाणी शुल्क / देशांतर्गत खर्च / विदेश प्रवास खर्च / कार्यालयीन खर्च / संगणक खर्च / इतर प्रशासकीय खर्च / व्यावसायिक व विशेष सेवा / मोटार वाहने व इतर कार्यालयीन खर्च करणे इत्यादी बाबींसाठी मागणी क्रमांक-ए-४, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ८०० इतर खर्च (००)(१०) महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, (२०७० ए००२) (योजनांतर्गत)" हा लेखाशीर्ष, सदर कार्यालय नियमितरित्या कार्यान्वित होईपर्यंत केवळ तात्पुरत्या स्वरुपात सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) मध्ये रोख शाखा (कार्यासन-२६) कडे कार्यान्वित करण्यास तसेच सदर लेखाशीर्षाच्या नियंत्रणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून उपसचिव (आस्थापना) आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (२६-रोख शाखा) या पदधारकांस घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१७१७०९५१९६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2017.03.17 17:12:40 +05'30'

**( संतोष वि.रोकडे )**

प्रभारी उपसचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. राज्य सूचना अधिकारी, राष्ट्रीय सूचना केंद्र, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
९. सहसचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उपसचिव (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उपसचिव तथा नियंत्रक अधिकारी (कार्यासन-२६ रोख), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी (कार्यासन-२६ रोख), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उपसचिव (कार्यासन-२५ अर्थसंकल्प कक्ष), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती / कार्यासन-१८.